**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात विविध स्रोताव्दारे प्राप्त झालेला निधी पूर्वीची तपशिलवार देयके प्रलंबित असतांना संक्षिप्त देयकावर निधी आहरीत करून हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई अंतर्गत खरेदी कक्षाकडे वर्ग करून खर्च करण्यासाठी मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/भाग-१/आरोग्य-८**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २९ डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८ दि.०७.०३.२०१८.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन पुरक पत्र क्र.खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/भाग-१/आरोग्य-८ दि.०४.०१.२०१९.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८ दि.३१.०३.२०२०.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८ दि.२८.१२.२०२०.
५) संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांचे पत्र क्र.संआसे/संचालक कक्ष/संक्षिप्त देयकावर निधी आहरीत/मुदत वाढ/कक्ष-५८/२२३३८-४१/२०२१, दिनांक ०३.१०.२०२१

**प्रस्तावना:-**

संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी त्यांच्या दि. ०३.१०.२०२१ रोजी सादर केलेल्या प्रस्तावानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात विविध स्रोताव्दारे प्राप्त झालेला निधी पूर्वीची तपशिलवार देयके प्रलंबित असतांना संक्षिप्त देयकावर निधी आहरीत करून हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई अंतर्गत खरेदी कक्षाकडे वर्ग करून खर्च करण्यासाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. १ अन्वये हाफकीन जीव औषध महामंडळ, मुंबई यांच्या अंतर्गत खरेदी कक्ष स्थापन करून सन २०१७-१८ पासून औषधी, उपकरणे, यंत्रसामुग्री व तदअनुषंगिक वस्तुसाठी अर्थसंकल्पीत निधी संक्षिप्त देयकाद्वारे आहरीत करुन हाफकीन महामंडळ, मुंबई अंतर्गत खरेदी कक्षाकडे वर्ग करण्याबाबत निर्णय घेण्यांत आला होता. संदर्भ क्र. २ अन्वये गृह विभागास दिलेल्या परवानगीच्या धर्तीवर सार्वजनिक आरोग्य विभागास संक्षिप्त देयकांची तपशीलवार देयके (एसी बिल) प्रलंबित असताना दुस-या संक्षिप्त देयकावर निधी आहरित करण्यासाठी पर्यायी व्यवस्था होईपर्यंत (या

प्रयोजनार्थ नविन लेखाशिर्ष उपलब्ध होईपर्यंत) विशेष बाब म्हणून मान्यता प्रदान करण्यात आली होती. संदर्भ क्र. ३ अन्वये तपशिलवार देयके मार्च, २०२१ पर्यंत कोषागारात सादर करण्यासाठी खास बाब म्हणून मान्यता देण्यात आली होती. संदर्भ क्र.४ अन्वये सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात विविध स्त्रोताव्दारे उक्त प्रयोजनासाठी प्राप्त झालेला निधी पुर्वीची तपशिलवार देयके प्रलंबित असताना संक्षिप्त देयकावर आहरीत करुन हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई अंर्तगत खरेदी कक्षाकडे वर्ग करुन खर्चकरण्यासाठी दिनांक ३१ मार्च, २०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

०२. तथापी दिनांक २३ मार्च २०२० पासून कोविड-१९ या संसर्गजन्य महामारीमुळे देशात संचारबंदी, साथरोग अधिनियम लागू होता, सबब सन २०१७-१८ सन २०१८-१९ व सन २०१९-२० व सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील संक्षिप्त देयकांवर औषधे, यंत्रसामुग्री, वैद्यकीय उपकरणे, तदअनुषंगिक वस्तु व साधन सामुग्री या बाबींच्या खरेदीसाठी आहरीत केलेल्या निधीची तपशिलवार देयके कोषागारात आहरण व संवितरण अधिकारी सादर करतील, या अटीवर सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात विविध स्त्रोताव्दारे उक्त प्रयोजनासाठी प्राप्त झालेला निधी पुर्वीची तपशिलवार देयके प्रलंबित असताना संक्षिप्त देयकावर आहरीत करुन हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई अंर्तगत खरेदी कक्षाकडे वर्ग करुन खर्च करण्यासाठी **दिनांक ३१ मार्च, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.**

०३. कोषागारातून संक्षिप्त देयकाद्वारे आहरित केलेल्या निधी संदर्भातील रक्कम व तपशिलवार देयकांचा ताळमेळ घालून तपशिलवार देयके कोषागारात सादर करण्याची दक्षता आयुक्तालयाने व महामंडळाने घ्यावी तसेच याबाबत लेखा आक्षेप येऊ नये, रक्कमेचा अपहार होऊ नये याबाबतचीही दक्षता घ्यावी.

०४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्र. ३४१/२०२१ / विनिमय, दिनांक २९.११.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०२१५०८१३३५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284,
pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250,
serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.12.29 17:16:50 +05'30'

(वि.ल.लहाने)
**सह सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.परेल,मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यास्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
११) अधिकक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)